**नंदूरबार शहर एकात्मिक रस्ते विकास योजनेच्या सुधारीत प्रस्तावास मंजुरी प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः खाक्षेस-२००४ / प्र.क्र. ११८ / रस्ते-८.**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०१ ऑक्टोबर, २०१८.

**वाचा**

१) शासन निर्णय, क्र. खाक्षेस - २००१/ प्र.क्र. २२५/रस्ते-९, दि.११.०८.२००३.
२) शासन निर्णय, क्र. खाक्षेस - २००४/ प्र.क्र. ११८ /रस्ते-८, दि.१८.०५.२००९.

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या दि.११.०८.२००३ रोजीच्या शासन निर्णयानुसार नंदुरबार शहरातील वाहतूक व्यवस्थेत सुधारणा करण्यासाठी अंदाजित किंमत रु. १६.४३ कोटी खर्चाची रस्ते व पुलांची कामे "बांधा व हस्तांतरीत करा" या तत्वावर कार्यान्वित करण्यासाठी महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास "उद्योजक" म्हणून घोषित करण्यात आले आहे. सदर प्रकल्पाचा सवलत कालावधी २४ वर्षे इतका आहे. तद्नंतर सार्वजनिक बांधकाम विभागाने दि.१८.०५.२००९ रोजीच्या शासन निर्णयान्वये नंदुरबार शहर एकात्मिक रस्ते विकास योजनेअंतर्गत दि.१९.०५.२००९ ते ३१.१२.२०१६ या कालावधीसाठी पथकर नाक्यावर पथकराची रक्कम वसुल करण्याचा हक्क महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ (मर्या), मुंबई यांना प्रदान केला आहे. सदर प्रकल्पावर दि.०६.१०.२०१० ते दि.१०.११.२०१२ या कालावधीमध्ये पथकर वसुली करण्यात आली असून तद्नंतर स्थानिकांच्या तीव्र विरोधामुळे पथकर वसुली तात्पुरत्या स्वरुपात बंद झाली आहे. सदर प्रकल्पावर प्रत्यक्षात रु.२७.३५ कोटी इतका खर्च झालेला आहे. सदर योजनेअंतर्गत महामंडळास झालेल्या खर्चास व त्यातील सुधारीत वावास तसेच महामंडळाने केलेल्या खर्चावर व्याजासह रक्कम देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याअनुषंगाने मंत्रिमंडळ पायाभूत सुविधा समितीच्या दिनांक २३.०८.२०१८ रोजी झालेल्या बैठकीत सदर बाबीस मान्यता देण्यात आलेली आहे. यानुसार आता शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

नंदुरबार शहर एकात्मिक रस्ते विकास योजनेची मुळ मंजुर रक्कम रु.१६.४३ कोटी इतकी असून, महामंडळाने प्रत्यक्षात केलेल्या कामाची सुधारीत रक्कम रु.२७.३५ कोटी येत आहे. या अनुषंगाने सदर प्रकल्पास शासनाची खालीलप्रमाणे मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१. नंदुरबार शहर एकात्मिक रस्ते विकास योजनेच्या रु. २७.३५ कोटीच्या सुधारीत अंदाजित किंमतीस तसेच त्यामध्ये समाविष्ट कामांच्या वावास मान्यता देण्यात येत आहे.

२. नंदुरबार शहर एकात्मिक रस्ते विकास योजना या प्रकल्पावर महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळाने केलेल्या कामापोटी १४% व्याजदराने दि.३१.१०.२०१६ अखेरपर्यंत येणारी रु.६०.६६ कोटी एवढी रक्कम महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास अर्थसंकल्पिय तरतुदीमधून एकरकमी उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे. या थकीत रकमेवर रोकड प्रवाहानुसार रक्कम परिगणित करुन व्याजासहीत येणारी एकूण देय रक्कम वित्त विभागाकडून अंतिमत: प्रमाणित करुन महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळास एकरकमी अदा करण्यात यावी.

सदर शासन निर्णय, नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. १००/१४६१, दि. २८.०५.२०१८ तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ५९/व्यय-११, दि. ०८.०३.२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीसअनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००११७४९२३९८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Avinash Trimbakrao Dhondge

Digitally signed by Avinash Trimbakrao Dhondge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=c027c83219049ab50c11c48a886d96688cd20f344566980536900a21e1d9a74b, serialNumber=4be0cd9a533d89e3ab5f3d01c44606657e57bbf30754f79095f947378c30d155,
cn=Avinash Trimbakrao Dhondge
Date: 2018.10.01 17:52:47 +05'30'

**(अविनाश त्रिं.धोंडगे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत -**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम, मंत्रालय, मुंबई
४) मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम), मंत्रालय, मुंबई
५) मा.राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम, मंत्रालय, मुंबई
६) मा.राज्यमंत्री, सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम), मंत्रालय, मुंबई.
७) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
८) सर्व विधानसभा सदस्य / विधानपरिषद सदस्य.
९) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
१०) अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई
११) अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई

१२) प्रधान सचिव (महसूल व वन विभाग), मंत्रालय, मुंबई
१३) प्रधान सचिव (विधि व न्याय विभाग), मंत्रालय, मुंबई
१४) प्रधान सचिव (नगर विकास विभाग), मंत्रालय, मुंबई
१५) सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, म.रा.र.वि. महामंडळ, वांद्रे, मुंबई-५०
१७) सर्व मंत्रालयीन विभाग
१८) निवड नस्ती (रस्ते-८), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय